**स्वच्छ महाराष्ट्र अभियान (ना.) २.० अंतर्गत सिंदखेडराजा नगरपरिषदेला आकांक्षी शौचालय उभारणी करण्यासाठी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्वमअ-२०२३/प्र.क्र. ९२(१)/नवि-३४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : २५ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.स्वमअ-२०२२/प्र.क्र.७७/नवि-३४ दि.१५ जुलै, २०२२.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.स्वमअ-२०२३/प्र.क्र. ९२(१)/नवि-३४, दि. ३१ ऑगस्ट, २०२३.
३. राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या दिनांक ७ जानेवारी, २०२५ च्या १५ बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी) २.०" च्या धर्तीवर राज्यामध्ये स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० ची अंमलबजावणी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सुरू करण्यात आली आहे. या अभियानांतर्गत राज्यातील सर्व शहरे कचरामुक्त करण्याचे मुख्य उद्दिष्ट असून या अंतर्गत शहरातील सर्व प्रकारच्या घनकचऱ्याचे शास्त्रोक्त व्यवस्थापन व शाश्वत स्वच्छता आणि वापरलेल्या पाण्यावर प्रक्रिया करणे समाविष्ट आहे.

२. संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सिंदखेडराजा नगरपरिषद जि. बुलडाणा या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या आकांक्षी शौचालय या घटकाअंतर्गतच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. परंतू, सदर शौचालय उभारणीच्या जागेला लागुनच असलेल्या सिंदखेडराजा नगरपरिषद हद्दीतील रंगमहाल जवळील जागेवर पुरातत्व विभागाकडून स्त्री-पुरुष स्वच्छतागृह, महिलांसाठी स्तनपानकक्ष व उपहारगृह इत्यांदीचा समावेश असलेले जनसुविधा केंद्र बांधण्याचे काम प्रगतीपथावर असल्याने संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सिंदखेडराजा नगरपरिषद जि. बुलडाणा आकांक्षी शौचालय या घटकाअंतर्गतच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय देण्यात आलेली मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सिंदखेडराजा नगरपरिषद जि. बुलडाणा या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या आकांक्षी शौचालय या घटकाअंतर्गतच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यात आली

होती. परंतू, सदर शौचालय उभारणीच्या जागेला लागुनच असलेल्या सिंदखेडराजा नगरपरिषद हद्दीतील रंगमहाल जवळील जागेवर पुरातत्व विभागाकडून स्त्री-पुरुष स्वच्छतागृह, महिलांसाठी स्तनपानकक्ष व उपहारगृह इत्यांदीचा समावेश असलेले जनसुविधा केंद्र बांधण्याचे काम प्रगतीपथावर असल्याने सिंदखेडराजा नगरपरिषदेला प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली आकांक्षी शौचालयाची आवश्यकता नाही. ही बाब स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) २.० अंतर्गत राज्यस्तरीय तांत्रिक समितीच्या (SLTC) १५ व्या बैठकीत मांडण्यात आली असून सिंदखेडराजा नगरपरिषद जि. बुलढाणा यांना मंजूर केलेले आकांक्षी शौचालय रद्द करण्यास सदर बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. आता यास्तव या शासन निर्णयान्वये संदर्भ क्रमांक २ येथील नमुद शासन निर्णयाद्वारे सिंदखेडराजा नगरपरिषदेला आकांक्षी शौचालय उभारणी करण्यासाठी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२५१६२३३५९०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.03.25 16:25:04 +05'30'

**(अनिरुद्ध जेवळीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, अमरावती.
५. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
६. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय, मुंबई.
७. मुख्याधिकारी, सिंदखेडराजा नगरपरिषद, जि. बुलढाणा.
८. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
९. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
१२. निवडनस्ती,नवि-३४.